**शासकीय व अशासकीय अनुदानित व कायम विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालयातील नियमित बी. एड. अभ्यासक्रमासाठीच्या सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षासाठी शिक्षण शुल्क व प्रवेश पद्धती <u>याबाबतची सुधारित नियमावली.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : बी.एड. २०११ / प्र. क्र. ४९ / मशि - २,
**मंत्रालय ( विस्तार ), मुंबई - ४०० ०३२.**
दिनांक : ४ मे, २०११.

वाचा : १. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्रमांक एनजीसी २००४ / (४१ / ०४ ) / मशि - ३, दिनांक १६ फेब्रुवारी, २००४.
२. शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं / २०११ / बी. एड. सीईटी नियमावली / बी. एड. / ९२००, दिनांक १६ मार्च, २०११.,

## शासन निर्णय

बी. एड. प्रवेशाबाबतच्या नियमांस सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षासाठी मान्यता देण्याबाबत संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक १६ मार्च, २०११ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन खालील नियमावलीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

### बी.एड. प्रवेश : शैक्षणिक वर्ष २०११-२०१२
### नियमावली

१. प्रवेश पात्रता

१.१ महाराष्ट्रातील शासकीय, अशासकीय अनुदानित, अशासकीय विनाअनुदानित / कायम विना अनुदानित व अल्पसंख्यांक संस्था संचालित अनुदानित, विना अनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षणशास्त्र महाविद्यालयामध्ये नियमित बी.एड अभ्यासक्रमासाठी द्यावयाचे प्रवेश विद्यापीठ विभागानुसार सामाईक प्रवेश परीक्षा (CET) घेऊन गुणवत्तेनुसार खालील पध्दतीने केंद्रिय प्रवेश प्रक्रियेव्दारे (Govt. CAP) करण्यात येतील.

अ. शासकीय व अनुदानित महाविद्यालये : १०० टक्के जागा
ब. शासकीय केंद्रीय प्रवेश प्रक्रीयेत सहभागी अशासकीय विनाअनुदानित / कायम विना अनुदानित महाविद्यालये : ८० टक्के जागा
क. १. अनुदानित अल्पसंख्यांक महाविद्यालये : ५० टक्के जागा
२. शासकीय केंद्रीय प्रवेश प्रक्रीयेत सहभागी अशासकीय विनाअनुदानित/ कायम विना अनुदानित अल्पसंख्यांक महाविद्यालये : ५० टक्के जागा

ड. केंद्रिय प्रवेश प्रक्रियेत सहभागी असणाऱ्या अशासकीय विनाअनुदानित / कायम विना अनुदानित संस्थांनी आपला २० टक्के व्यवस्थापन कोटा भरतांना दिनांक १६ फेब्रुवारी, २००४ च्या शासन निर्णयामध्ये विहित केल्यानुसार केंद्रिय प्रवेश प्रक्रियेतील (Govt. CAP) वर्षे २०११-१२ च्या सीईटी उत्तीर्ण पात्र उमेदवारातूनच अथवा महाराष्ट्र विनाअनुदान अध्यापक महाविद्यालय संस्था चालक असोसिएशन ( Asso. CAP) यापैकी एकाच (CAP) मधून गुणवत्तेनुसार भरता येईल. दोन्ही (CAP) मधून जागा भरता येणार

नाहीत.

केंद्रीय प्रवेश प्रक्रियेतून ज्या विनाअनुदानित / कायम विना अनुदानित अध्यापक महाविद्यालयाने व्यवस्थापन कोट्यांतर्गत जागा भरल्या आहेत त्या अध्यापक महाविद्यालयांना त्यांच्या Login ID मधून प्रवेशपत्र काढून देणे आवश्यक राहील. केंद्रीय प्रवेश प्रक्रियेतून व्यवस्थापन कोटयांतर्गत प्रवेशित उमेदवाराची यादी केंद्रीय प्रवेश प्रक्रियेद्वारा प्रमाणित करुन घेणे आवश्यक राहील. केंद्रीय प्रवेश प्रक्रीयेत सहभागी अशासकीय विना अनुदानित / कायम विनाअनुदानित महाविद्यालयाने महाराष्ट्र विनाअनुदान अध्यापक महाविद्यालय संस्था चालक असोसिएशन ( Asso. CAP) मधून व्यवस्थापन कोटा भरला असेल तर व्यवस्थापन कोटयांतर्गत प्रवेशित उमेदवाराची यादी महाराष्ट्र विनाअनुदान अध्यापक महाविद्यालय संस्था चालक असोसिएशकडून प्रमाणित करुन घेणे व प्रवेश नियंत्रण समितीकडून मान्य करून घेणे अनिवार्य राहील.

तसेच व्यवस्थापन कोटयांतर्गत सदर बी.एड प्रवेश नियमावलीनुसार विषय व संवर्गनिहाय जागा भरणेही अनिवार्य राहिल.

व्यवस्थापन कोटयांतर्गत पुरेशा जागा संस्थेला उपलब्ध न झाल्यास अथवा संस्था व्यवस्थापन कोटा घेऊ इच्छित नसल्यास त्या जागा संस्थेला केंद्रीय प्रवेश प्रक्रियेकडे समर्पित करता येतील.

इ. अनुदानित अल्पसंख्यांक महाविद्यालयांनी भरावयाच्या ५० टक्के जागा दिनांक १६ फेब्रुवारी, २००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार केंद्रिय प्रवेश प्रक्रियेतील वर्ष २०११-१२ च्या सीईटी उत्तीर्ण पात्र उमेदवारातूनच बी.एड प्रवेश नियमाचे पालन करुन संबंधित अल्पसंख्यांक उमेदवारांमधूनच गुणवत्तेनुसार भरणे अनिवार्य राहिल. प्रवेशित उमेदवारांना संबंधित महाविद्यालयाने त्यांच्या Login ID मधून प्रवेशपत्र काढून देणे आवश्यक राहील. अल्पसंख्यांक कोटयांतर्गत प्रवेशित उमेदवारांची यादी केंद्रिय प्रवेश प्रक्रियेमार्फत प्रमाणित करुन घेणे आवश्यक राहील.

अल्पसंख्यांक कोटयांतर्गत पुरेशा जागा संस्थेला उपलब्ध न झाल्यास अथवा संस्था अल्पसंख्यांक कोटा घेऊ इच्छित नसल्यास त्या जागा संस्थेला केंद्रीय प्रवेश प्रक्रियेकडे समर्पित करता येतील.

ई. केंद्रीय प्रवेश प्रक्रियेत सहभागी अशासकीय विनाअनुदानित आणि कायम विना अनुदानित अल्पसंख्यांक अध्यापक महाविद्यालयांना अल्पसंख्यांक कोटा केंद्रीय प्रवेश प्रक्रिया (Govt. CAP) अथवा महाराष्ट्र विनाअनुदान अध्यापक महाविद्यालय संस्था चालक असोसिएशन (Asso.CAP) यापैकी एकाच CAP मधून जागा भरता येतील. दोन्ही CAP मधून एकत्रित जागा भरता येणार नाहीत. ज्या विनाअनुदानित कायम विना अनुदानित अल्पसंख्यांक अध्यापक महाविद्यालयाने केंद्रीय प्रवेश प्रक्रिये (CAP) मधून अल्पसंख्यांक कोटा भरला आहे त्यांना Login ID मधून प्रवेशपत्र काढून देणे आवश्यक राहील. तसेच अल्पसंख्यांक कोटयांतर्गत प्रवेशित उमेदवारांची यादी केंद्रीय प्रवेश प्रक्रियेद्वारा प्रमाणित करुन घेणे आवश्यक राहील. केंद्रीय प्रवेश प्रक्रीयेत सहभागी अशासकीय विना अनुदानित / कायम विनाअनुदानित अल्पसंख्यांक अध्यापक महाविद्यालयाने महाराष्ट्र विना अनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्था चालक असोसिएशनमार्फत अल्पसंख्यांक कोटा भरला असेल तर अल्पसंख्यांक कोट्यांतर्गत प्रवेशित उमेदवाराची यादी महाराष्ट्र विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोसिएशन तसेच प्रवेश नियंत्रण समितीकडून मान्य करून घेणे अनिवार्य राहील.

अल्पसंख्यांक कोटयांतर्गत पुरेशा जागा संस्थेला उपलब्ध न झाल्यास अथवा संस्था अल्पसंख्यांक कोटा घेऊ इच्छित नसल्यास त्या जागा संस्थेला केंद्रीय प्रवेश प्रक्रियेकडे समर्पित करता येतील.

१.२ महाराष्ट्र विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालय संस्थाचालक असोसिएशनचे सदस्य असलेले अशासकीय विना अनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील प्रवेश संघटनेमार्फत घेतलेली त्या त्या वर्षाची सामाईक परीक्षा (Asso. CET) व (Asso.CAP) द्वारा एक खिडकी योजने अंतर्गत प्रवेश होणे बंधनकारक राहील. मा. सर्वोच्च न्यायालय / मा. उच्च न्यायालय / प्रवेश नियंत्रण समितीचे निर्णय / शासनाकडून वेळोवेळी प्रसिध्द करण्यात आलेले प्रचलित निर्णय व नियम बंधनकारक राहतील. महाविद्यालयात प्रवेशित उमेदवारांची यादी असोसिएशनद्वारा प्रमाणित करुन प्रवेश नियंत्रण समितीकडून मान्य करून घेणे बंधनकारक राहील.

१.३ अ) १) मान्यताप्राप्त अकृषि विद्यापीठे, कृषि विद्यापीठे, मुक्त विद्यापीठे व अभिमत विद्यापीठे यांच्या कला / विज्ञान / वाणिज्य / गृहविज्ञान / कृषिविज्ञान / संगणक / माहिती तंत्रज्ञान / अभियांत्रिकी /

समाजकार्य (BSW) या विद्याशाखांमधून ज्यांनी शालेय / उच्च माध्यमिक स्तरावरील विषयात तीन वर्षांची पदवी किंवा पदव्युत्तर पदवी प्राप्त केली असेल व पदवी किंवा पदव्युत्तर पदवीला खुल्या संवर्गातील ज्या उमेदवाराला किमान ५० टक्के गुण (प्रवेश अर्जासाठी ४९.५ टक्के व त्यापुढील अपूर्णांकातील गुण ५० टक्के पुर्णांकात धरण्यांत येतील) व मागासवर्गीय संवर्गातील (अ.जा., अ.ज., वि.जा.भ.ज., इ.मा.व. व वि.मा.प्र.) ज्या उमेदवारांना किमान ४५ टक्के गुण (प्रवेश अर्जासाठी ४४.५टक्के व त्यापुढील अपूर्णांकातील गुण ४५ टक्के पुर्णांकात धरण्यांत येतील) व महाराष्ट्राबाहेरील विद्यापीठातील सर्व संवर्गातील उमेदवारांना किमान ५० टक्के गुण मिळाले आहेत (प्रवेश अर्जासाठी ४९.५ टक्के व त्यापुढील अपूर्णांकातील गुण ५० टक्के पुर्णांकात धरण्यांत येतील) असे उमेदवार बी.एड. प्रवेशासाठी घेण्यात येणाऱ्या सामायिक प्रवेश परिक्षेस (CET) बसण्यास पात्र राहतील.

खालील पदवीधारक उमेदवार बी.एड प्रवेशास पात्र राहणार नाहीत.

(१) दोन वर्षाच्या अभ्यासक्रमाची पदवी धारण करणारे उमेदवार ,

(२) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक समक १०९९/१३४/मशि-४, दिनांक १४.०६.१९९९, शासन पूरकपत्र क्रमांक : समक १०९९ / १३४ / मशि १, दिनांक ५.४.२००३ तसेच शासन निर्णय क्रमांक : समक २००७ / (२६ / ०७) / मशि ६, दिनांक २८.२.२००७ अन्वये शासनाने पदवी समकक्षता दिलेले पदवीधारक,

(३) नियम क्र.१.३ अ मध्ये नमूद केलेल्या विद्याशाखा व्यतिरिक्त इतर विद्याशाखेचे पदवीधर.

**अ)** २) सामायिक प्रवेश परिक्षेस (CET) खुल्या संवर्गातील उमेदवारास ५० पैकी किमान १८ गुण व मागासवर्गीय संवर्गातील उमेदवारास किमान १५ गुण व महाराष्ट्राबाहेरील विद्यापीठातील सर्व संवर्गातील उमेदवारास किमान १८ गुण मिळाले असतील, तर ते उमेदवार बी.एड. अभ्यासक्रमाच्या प्रवेशाला पात्र राहतील.

**ब)** इंग्रजी माध्यमात प्रवेशोच्छुक उमेदवाराने सामायिक प्रवेश परीक्षा (CET) व्यतिरिक्त इंग्रजी भाषा ज्ञान चाचणी परीक्षा देणे आवश्यक आहे. इंग्रजी माध्यमाच्या प्रवेशपात्रतेसाठी इंग्रजी भाषा ज्ञान चाचणी ( ELCT ) परीक्षेत ५० पैकी १८ गुण (३६ टक्के) प्राप्त करणे आवश्यक आहे.

**क)** शिक्षक म्हणून सेवेत असलेल्या व किमान दोन शैक्षणिक वर्षे पूर्ण वेळ सलग सेवा झालेल्या व ज्यास प्रशिक्षित शिक्षक (Trained Teacher) किंवा अप्रशिक्षित शिक्षक (Untrained Teacher) म्हणून शालेय शिक्षण विभागाकडून मान्यता प्राप्त झाली आहे अशा उमेदवारास नियमित बी.एड. अभ्यासक्रमासाठी प्रवेश अर्ज करण्यासाठी १.३ अ (१) मधील किमान शेकडा गुणाची अट लागू राहणार नाही. सदर सेवा संबंधित शिक्षणाधिकारी किंवा गट शिक्षणाधिकारी यांनी प्रमाणित केलेले किंवा तसेच केंद्रीय / सीबीएससी शाळेतील शिक्षकांसाठी संबंधित सक्षम अधिकाऱ्यांने सेवा प्रमाणित केलेले अनुभवाचे प्रमाणपत्र तसेच संस्थेचे नियुक्ती पत्र व सोबत बी.एड अभ्यासक्रमासाठी कार्यमुक्त केल्याचे संस्थेचे पत्र जोडणे आवश्यक राहील. तथापि, अशा उमेदवारांना सीईटीच्या किमान गुणाची अट १.३ अ (२) प्रमाणे अनिवार्य आहे. (मानद (Honorary), मानधनावरील (Honorarium), अर्धवेळ (Part Time), बिनपगारी अथवा तासिकातत्वावरील (CHB) सेवा ग्राहय धरल्या जाणार नाहीत.)

**ड)** जे उमेदवार मार्च / एप्रिल २०११ ला पदवीच्या अंतिम परिक्षेला बसणार आहेत ते उमेदवार सामायिक प्रवेश परीक्षा (C.E.T.) देण्यास पात्र राहतील. महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम भरण्याच्या कालावधीपर्यंत ज्या उमेदवारांच्या पदवी परीक्षेचा निकाल जाहीर होईल व जे १.३ अ प्रमाणे तसेच इंग्रजी माध्यमासाठी १.३ अ व ब प्रमाणे पात्र असतील व जे प्राधान्यक्रम अर्ज ( Option Form ) भरतील अशांचा समावेश बी.एड. प्रवेश प्रक्रियेत केला जाईल. ज्या उमेदवारांचा प्रवेश प्रक्रियेच्या मधल्या काळात पदवी निकाल लागेल व ते बी.एड प्रवेशासाठी नियम क्रमांक १.३ अ तसेच इंग्रजी माध्यमासाठी १.३ अ व ब प्रमाणे पात्र असतील तर त्यांस त्यावेळी प्राधान्यक्रम अर्ज ( Option Form ) भरता येईल व त्यानंतरच्या प्रवेश प्रक्रियेत त्यांचा समावेश केला जाईल. अशा उमेदवारांना प्राधान्य क्रम अर्ज भरण्यापूर्वी झालेल्या प्रवेश प्रक्रियेत गुणवत्तेनुसार स्थान मागता येणार नाही.

१.४ ज्या विद्यापीठाच्या पदवी परीक्षेच्या गुणपत्रकात गुणांच्या ऐवजी श्रेणी (ग्रेड) दिलेली असेल अशा उमेदवारांनी त्या त्या विद्यापीठाचे त्या श्रेणीशी (ग्रेड) समकक्ष गुण दर्शविणारे साक्षांकित प्रमाणपत्र अर्जासोबत जोडणे आवश्यक आहे. ज्या विद्यापीठात विषयांच्या ऐवजी कोड नंबर दिलेले असतील त्यांनी विषयांचा कोड नंबर तक्ता सोबत जोडणे आवश्यक आहे.

१.५ उमेदवारांना पदवी परीक्षेच्या ज्या गुणांवर पदवी प्राप्त झाली आहे (विद्यापीठाने दिलेल्या अतिरिक्त

गुणांची गणना करुन) त्या एकूण गुणांची टक्केवारी किमान पात्रतेसाठी व गुणवत्तेसाठी ग्राह्य धरली जाईल. (उदा.काही विद्यापीठांत तीन वर्षाचे गुण एकत्रित करुन पदवी दिली जाते, काही विद्यापीठात दोन वर्षाचे गुण एकत्रित करुन पदवी दिली जाते तर काही विद्यापीठात केवळ तृतीय वर्षाच्या गुणांवर पदवी दिली जाते.) विद्यापीठाने श्रेणी/ वर्ग देण्यासाठी स्विकारलेल्या पध्दतीनुसार पदवी गुणाची गणना करावी.

१.६ १) उमेदवाराने विशेष अध्यापन पध्दतीच्या विषयाच्या प्रवेश अर्जात नोंद करतांना निवडलेला विषय हा पदवी अभ्यासक्रमातील अनिवार्य / सक्तीचा (Compulsory) विषय असू नये. तो विषय ऐच्छिक (Optional) / विशेष (Special) / दुय्यम ( Subsidiary ) असावा. त्या विषयाचे पदवीला प्रथम / द्वितीय / तृतीय वर्ष मिळून किमान ६ पेपर्स असणे आवश्यक आहे. विशेष अध्यापन पध्दतीसाठी (Special Method) निवडावयाचा विषय हा शालेय / उच्च माध्यमिक स्तरावरील विषयापैकी एक असावा. या विषयाची सोय ज्या अध्यापक महाविद्यालयात आहे, त्या अध्यापक महाविद्यालयात तो प्रवेशास पात्र राहील.

२) नागपूर विद्यापीठांतर्गत त्या विद्यापीठाच्या अधिनियमानुसार प्रवेशासाठी उमेदवाराने निवडलेला विशेष अध्यापन पध्दतीचा विषय पदवीस्तरावरचा असावा. त्याचबरोबर दुसऱ्या अध्यापन पध्दतीसाठी निवडावयाचा विषयही पहिल्या विषयाप्रमाणे पदवीस्तरावर अभ्यासला असणे आवश्यक आहे. तसेच तृतीय वर्षापर्यंत किमान एक वर्ष इंग्रजी भाषा हा विषय आवश्यक विषय म्हणून अभ्यासलेला असावा. नागपूर विद्यापीठांतर्गत प्रवेश घेऊ इच्छिणारा उमेदवार त्या विद्यापीठाच्या नियमानुसार पात्र असेल तरच तो उमेदवार नागपूर विद्यापीठातील अध्यापक महाविद्यालयात प्रवेशास पात्र राहील. नागपूर विद्यापीठाच्या अधिनियमानुसार खालीलपैकी कोणतेही दोन ऐच्छिक विषय (Optional) म्हणून पदवीस्तरावर अभ्यासलेले असावेत. त्यांची निवड अध्यापन पध्दतीसाठी उमेदवाराला करता येईल. तथापि प्राधान्यक्रम देताना ते विषय संबंधित शिक्षणशास्त्र महाविद्यालयात असणे आवश्यक आहे.

१) मराठी, २) इंग्रजी, ३) हिंदी, ४) संस्कृत, ५) पाली, ६) ऊर्दू, ७) इतिहास, ८) भूगोल, ९) नागरिकशास्त्र, १०) अर्थशास्त्र, ११) वाणिज्य, १२) रसायनशास्त्र, १३) भौतिकशास्त्र, १४) जीवशास्त्र १५) गणित, १६) गृहविज्ञान, १७) संगीत

३) महाराष्ट्रातील काही विद्यापीठांतर्गत एखाद्या विषयाचे प्रथम, द्वितीय आणि तृतीय वर्ष मिळून पाच पेपर्स घेऊन पदवी मिळवता येते. अशा विद्यापीठाच्या उमेदवारांनी ज्या ऐच्छिक (Optional) / विशेष (Special) / दुय्यम (Subsidiary) विषयांचे पाच पेपर्स दिले आहेत, तो विषय विशेष अध्यापन पध्दतीसाठी त्यांना निवडावयाची मुभा राहील व असे उमेदवार बी.एड. प्रवेशास पात्र समजण्यात येतील.

४) अमरावती व नागपूर विद्यापीठात पदवीच्या प्रथम वर्षाला एकूण ५ विषय असतात. त्यात दोन आवश्यक व तीन ऐच्छिक विषय असतात. तेच ऐच्छिक विषय द्वितीय व तृतीय वर्षाच्या अभ्यासक्रमात अंतर्भूत असतात. त्यामुळे विद्यार्थी कोणतेही तीनच पेपर्स विशेष स्तरावर किंवा दुय्यम स्तरावर अभ्यासून पदवी प्राप्त करु शकतो. म्हणून अमरावती, नागपूर किंवा यासारखा अभ्यासक्रम असलेल्या महाराष्ट्रातील अन्य विद्यापीठातून संबंधित विद्यापीठाच्या नियमानुसार उमेदवाराने संबंधित विषयाचे ऐच्छिक / विशेष / दुय्यम तीन पेपर्स घेऊन पदवी संपादन केली असेल तर तो विषय विशेष अध्यापन पध्दती क्र. १ साठी निवडावयाची मुभा राहील व अशा उमेदवारास बी.एड. प्रवेशास पात्र समजण्यात येईल.

५) जर एखादा उमेदवार एकापेक्षा अधिक विशेष अध्यापन पध्दतीसाठी पात्र व इच्छुक असेल तर अशा उमेदवाराने पात्र अध्यापन पध्दतीसाठी अर्जात सुचनेप्रमाणे नोंद करणे आवश्यक आहे. उमेदवाराने अध्यापन पध्दतीसाठीचा विषय पदवीस्तरावर ऐच्छिक (Optional) / विशेष (Special) / दुय्यम (Subsidiary) म्हणून अभ्यासलेला असावा. अनिवार्य/ सक्तीचा (Compulsory) विषय विशेष अध्यापन पध्दतीसाठी निवडता येणार नाही.

६) अ) उमेदवाराने अतिरिक्त विषय घेऊन अतिरिक्त पदवी प्राप्त केली असेल तर उपरोक्त १.६(५) या नियमाप्रमाणे तो विषय अध्यापन पध्दती निवडण्यास पात्र राहील; परंतु गुणवत्तेसाठी त्याचे प्रथम पदवीचे मुळ गुण ग्राह्य धरले जातील.

ब) नागपूर विद्यापीठात उमेदवारास अतिरिक्त पदवीचा विषय प्रथम अध्यापन पध्दतीसाठी (नागपूर विद्यापीठाच्या अधिनियमानुसार) निवडता येणार नाही.

७) केंद्रिय प्रवेश प्रक्रियेत समाविष्ट असणाऱ्या महाविद्यालयाबाबतची प्रवेशक्षमता, माध्यम, अध्यापनपध्दती व शिक्षणशुल्क इत्यादी माहिती वेबसाईटवर व ए.एल.सी सेंटरवर महाविद्यालयाचा

प्राधान्यक्रम भरतेवेळी उमेदवारांना उपलब्ध होईल.

१.७ अ) वाणिज्य विद्याशाखा / सामाजिकशास्त्र विद्याशाखा / कृषी / संगणक / समाजकार्य (BSW) / अभियांत्रिकी विद्याशाखा तसेच माहिती तंत्रज्ञान शाखेच्या पदवीधरांनी प्रवेश अर्जात अध्यापन पध्दतीऐवजी आपल्या विद्याशाखेची नोंद करावी. संबंधित अध्यापन पध्दती सर्व महाविद्यालयात उपलब्ध नाहीत, परंतु ५.१ क, ड, इ नुसार सर्व महाविद्यालयात संबंधित विषयांसाठी जागा राखीव आहेत. त्यामुळे गुणवत्तेनुसार प्रवेशित उमेदवाराला अशा महाविद्यालयात आपल्या विषयाची अध्यापन पध्दती मागण्याचा अधिकार असणार नाही. जर उमेदवाराला आपल्या विद्याशाखेची निवड अध्यापन पध्दतीसाठी करावयाची असेल तर उमेदवाराने ज्या अध्यापक महाविद्यालयात आपला विषय आहे त्याच महाविद्यालयाचा प्राधान्यक्रम द्यावा.

ब) केंद्रीय प्रवेश पध्दतीनुसार वरील विद्याशाखांच्या उमेदवारांना ज्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयात प्रवेश मिळेल त्या महाविद्यालयाचे प्राचार्य संबंधित उमेदवारास महाविद्यालयात उपलब्ध अध्यापन पध्दतीपैकी पदवीस्तरावरील विषयांशी सुसंगत अध्यापनपध्दती १ व २ निश्चित करतील. उदा. आय.टी / कृषी / संगणक या विषयांची अध्यापन पध्दती उपलब्ध नसल्यास अशा विद्यार्थ्यांना विज्ञान / गणित हे विषय घ्यावे लागतील.

क) प्रथम अध्यापन पध्दतीसाठी सोय असलेल्या प्रत्येक विषयासाठी माध्यमनिहाय, विषयनिहाय, संवर्गनिहाय, टक्केवारीनुसार एकूण उपलब्ध जागा विचारात घेऊन खालील प्रमाणे प्रवेश दिले जातील. :

१) प्रथम पदवी प्राप्त केलेल्या विद्यापीठातील विद्यार्थ्यांसाठी ७० टक्के जागा.

२) प्रथम पदवी प्राप्त केलेले विद्यापीठ सोडून महाराष्ट्रातील इतर विद्यापीठातील विद्यार्थ्यांसाठी २८ टक्के जागा.

३) महाराष्ट्राबाहेरील विद्यापीठातून प्रथम पदवी प्राप्त केलेल्या विद्यार्थ्यांसाठी २ टक्के जागा.

४) हे विभाजन तिसऱ्या फेरीपर्यंत राहील.

५) प्रवेशाच्या तीन फेऱ्यानंतर जागा शिल्लक राहिल्यास संबंधित अध्यापक महाविद्यालयामार्फत राज्यस्तरीय गुणवत्ता यादीतून गुणवत्तेनुसार विषयनिहाय / संवर्गनिहाय प्रवेश दिले जातील व त्यासाठीचे वेळापत्रक आवश्यकतेनुसार स्वतंत्रपणे वेबसाईट व वर्तमानपत्रे यामधून प्रसिध्द केले जाईल.

टीप : केंद्रीय प्रवेशपध्दतीद्वारा बी.एड. प्रवेश होत असल्यामुळे केंद्रीय बी.एड. प्रवेशाचे नियम राज्यातील सर्व विद्यापीठांना लागू राहतील.

## २ अतिरिक्त गुण-

२.१ खालील अ, ब आणि क यापैकी कोणत्याही एका अथवा अधिक उपक्रमात भाग घेतल्याचे प्रमाणपत्र सादर केल्यास उमेदवाराच्या पदवीच्या अंतिम परीक्षेतील **एकत्रित गुणसंख्येत जास्तीतजास्त पाच अतिरिक्त गुण मिळविण्यात येतील** व त्यानंतर गुणांची टक्केवारी काढली जाईल.

अ) ज्या उमेदवारांनी पदवी पर्यंत एन.एस.एस. / प्रौढ साक्षरता कार्यक्रमात अनुक्रमे किमान १२० ते २४० तास प्रत्यक्ष काम केल्याचे अथवा दोन वर्ष काम केल्याचे महाविद्यालय / विद्यापीठ यांचे प्रमाणपत्र सादर केले आहे अशा उमेदवारांना, (जरी गुणपत्रिकेवर अतिरिक्त म्हणून एन.एस.एस. चे गुण दर्शविलेले असतील तरी नियमाप्रमाणे पाच गुण देय राहतील.)

ब) एन.सी.सी. ची बी/सी ग्रेड परीक्षा उत्तीर्ण केल्याचे प्रमाणपत्र जोडले आहे अशा उमेदवारांना (जरी गुणपत्रिकेवर अतिरिक्त म्हणून एन.सी.सी.चे गुण दर्शविले असतील तरी नियमाप्रमाणे पाच गुण देय राहतील.)

क) आंतर-महाविद्यालयीन विद्यापीठीय स्तर, विद्यापीठ स्तर, आंतर-विद्यापीठ स्तर, राज्यस्तरीय, राष्ट्रीय अथवा आंतरराष्ट्रीय स्तरावर आयोजित क्रीडा, सांस्कृतिक कार्यक्रम व इतर स्पर्धेत भाग घेतल्याचे प्रमाणपत्र जोडले आहे अशा उमेदवारांना.

२.२ **अ)** कोणत्याही विद्याशाखेची पदव्युत्तर पदवी परीक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांस.

**ब)** डिप्लोमा इन एज्युकेशन / डिप्लोमा इन टिचर्स एज्युकेशन / बी.पी.एड / विद्यापीठाने किंवा शासनाने प्रदान केलेली शिक्षक प्रशिक्षण विषयक पदविका किंवा पदवी प्राप्त केलेल्या उमेदवारांस (फक्त एका पदवी किंवा पदविकेसाठी ) अंतिम परीक्षेत प्राप्त श्रेणीनुसार वरील अ आणि ब उमेदवारास अतिरिक्त शेकडा गुण पुढील प्रमाणे देण्यात येतील :

| प्राप्त केलेली श्रेणी | प्रथम श्रेणी | द्वितीय श्रेणी | तृतीय श्रेणी/उत्तीर्ण |
|---|---|---|---|
| अतिरिक्त शेकडा गुण | ५ | ४ | ३ |

G:\B.Ed.GR 2011-12.doc

**विशेष सूचना-**

**अ)** प्राधान्यक्रम अर्ज भरतेवेळी प्रवेश पात्रता असेल तरच उमेदवारांना अतिरिक्त गुणांचा लाभ मिळेल.

**ब)** शिक्षण प्रशिक्षण विषयक प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण उमेदवारास अतिरिक्त गुण मिळणार नाहीत.

**क)** उमेदवाराने एकापेक्षा अधिक पदव्युत्तर पदवी परीक्षा उत्तीर्ण केलेल्या असल्या तरी एकाच पदव्युत्तर पदवीसाठी अतिरिक्त गुणांचा लाभ घेता येईल.

**ड)** शिक्षक प्रशिक्षण विषयक एकापेक्षा अधिक पदवी किंवा पदविका परीक्षा उत्तीण केलेली असल्या तरी एकाच पदवी / पदविकेसाठी अतिरिक्त गुणांचा लाभ घेता येईल.

२.३ खालील अ, ब, क पैकी कोणत्याही एकाच संवर्गासाठी उमेदवाराशी नाते व संबंधितास सवलत देय असल्याचे सक्षम अधिकाऱ्याचे प्रमाणपत्र सादर केल्यास (शेकडा दोन) अतिरिक्त गुण देण्यात येतील.

अ) स्वातंत्र्य सैनिकांची मुले / मुली / पती / पत्नी यांना

ब) प्रकल्पग्रस्त / भूकंपग्रस्त कुटुंबातील उमेदवारांना

क) परित्यक्ता / घटस्फोटीत महिला / विधवांना.

३ **सामाईक प्रवेश परीक्षा (CET)**

अ) सामाईक प्रवेश परीक्षा ही मानसिक क्षमता, शिक्षक अभिक्षमता व सामान्यज्ञान या विषयांवर आधारित ५० गुणांची व १ तासाची वस्तुनिष्ठ ( बहुपर्यायी प्रश्न ) स्वरुपाची घेण्यात येईल.

ब) प्रवेश अर्ज, सी.ई.टी. परीक्षा व प्रवेशप्रक्रिया शुल्क :

१. खुल्या संवर्गासाठी व महाराष्ट्राबाहेरील सर्व संवर्गासाठी रु.६५०/-

२. महाराष्ट्रातील मागासवर्गीयासाठी (अ.जा., अ.ज., वि.जा.भ.ज., इ.मा.व. व वि.मा.प्र.) रु.३५०/-

( उमेदवाराने अर्ज घेतेवेळी मागासवर्गीस असल्याचे सक्षम प्राधिकाऱ्याचे प्रमाणपत्र दाखविणे आवश्यक आहे. )

सूचना : एकापेक्षा अधिक प्रवेश प्रकारासाठी (७० टक्के, २८ टक्के, २ टक्के)/ अध्यापन पध्दतीसाठी/माध्यमासाठी वेगळे शुल्क व अर्ज भरण्याची आवश्यकता नाही.

**क) सीईटीचे माध्यम मराठी व इंग्रजी असेल.**

४ **गुणवत्ता यादीतील क्रम ठरविण्याची पद्धती**

सामाईक प्रवेश-परीक्षेनंतर पात्र उमेदवारांच्या गुणवत्तायादीसाठी उमेदवाराने मिळविलेल्या गुणांचा विचार पुढीलप्रमाणे करण्यात येईल व त्याचा गुणवत्ता क्रम ठरविण्यात येईल :

**अ)** १) या पुस्तिकेतील नियम क्र. १.५ नुसार प्राप्त गुण आणि नियम २.१/२.२/२.३ नुसार प्राप्त अतिरिक्त गुणांची बेरीज करुन उमेदवारास प्राप्त झालेल्या गुणांकाचे ५० टक्के गुण.

२) जो उमेदवार पदव्युत्तर गुणांमुळे पात्र ठरला आहे, त्याची गुणवत्ता पदवीला प्राप्त गुण आणि नियम २.१/२.२/२.३ नुसार प्राप्त अतिरिक्त गुणांची बेरीज करुन उमेदवारास प्राप्त झालेल्या गुणांकाचे ५० टक्के गुण.

**ब)** सामाईक प्रवेश परीक्षेत उमेदवाराने प्राप्त केलेले गुण.

**क)** उमेदवाराने ४ अ १ अथवा ४ अ २ आणि ४ ब गटात प्राप्त केलेल्या गुणांची बेरीज करुन येणाऱ्या गुणांकानुसार उमेदवाराचा गुणवत्ता क्रम ठरविला जाईल.

५ **शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील जागांची विभागणी**

५.१ **अ. विद्याशाखानिहाय /विषयनिहाय**

प्रत्येक शिक्षणशास्त्र महाविद्यालयात विद्याशाखा-निहाय व विषय-निहाय जागांची विभागणी खालील प्रमाणे राहीलः

**ब. कला शाखा-**

| | |
|---|---|
| १) इंग्रजी अध्यापन पध्दती | १५ टक्के |
| २) मराठी अध्यापन पध्दती | १५ टक्के |
| ३) हिंदी अध्यापन पध्दती | १० टक्के |
| | **४० टक्के** |

(ज्या महाविद्यालयात तीनपेक्षा अधिक भाषा असतील तेथील जागांचे विभाजन महाविद्यालयामध्ये उपलब्ध सर्व भाषा अध्यापन पध्दतीमध्ये समान राहील.)

**क. शास्त्र शाखा-**

१) शास्त्र अध्यापन पध्दती २० टक्के

२) गणित अध्यापन पध्दती १५ टक्के
३) कृषी शास्त्र २ टक्के
४) संगणक / माहिती तंत्रज्ञान / अभियांत्रिकी ३ टक्के
**४० टक्के**

**ड. वाणिज्य शाखा एकूण - ५ टक्के**

**इ. सामाजिक शास्त्रे**

१) इतिहास अध्यापन पध्दती ६ टक्के
२) भूगोल अध्यापन पध्दती ६ टक्के
(ज्या महाविद्यालयात दोनपेक्षा अधिक सामाजिकशास्त्र अध्यापन पध्दती असतील त्या ठिकाणी उपलब्ध सर्व समाजशास्त्र अध्यापन पध्दतीमध्ये ५.१ इ १) व २) प्रमाणे उपलब्ध जागांचे विभाजन समान राहील.)
३) इतिहास व भूगोल वगळून इतर सामाजिक शास्त्रे ३ टक्के
**१५ टक्के**
**एकूण १०० टक्के**

५.२ **शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील जागांची विभागणी (विद्यापीठ क्षेत्रानुसार )**

**अ)** प्रत्येक शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील एकूण प्रवेश क्षमतेच्या शेकडा ७० टक्के जागा ते महाविद्यालय ज्या विद्यापीठ क्षेत्रात येते, त्या विद्यापीठाची प्रथम पदवी संपादन केलेल्या बी.एड. प्रवेशास पात्र उमेदवारांसाठी राहतील.

**ब)** १) प्रत्येक शिक्षणशास्त्र महाविद्यालयाच्या एकूण प्रवेश क्षमतेच्या शेकडा २८ टक्के जागांसाठी ते महाविद्यालय ज्या विद्यापीठ क्षेत्रात येते त्या विद्यापीठाचे पदवीधर उमेदवार वगळून महाराष्ट्रातील अन्य सर्व मान्यताप्राप्त अकृषी विद्यापीठे, कृषी विद्यापीठे, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ-पुणे. इंदिरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठाची महाराष्ट्रातील केंद्रे, मौलाना आझाद राष्ट्रीय मुक्त विद्यापीठाची महाराष्ट्रातील केंद्रे व यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक येथून पदवी संपादन केलेले उमेदवार बी.एड. प्रवेशास पात्र राहतील.

२) सैन्य दलातील सक्रिय असलेले आजी (ॲक्टिव्ह सर्व्हिसेस) / अधिकारी व कर्मचारी तसेच माजी सैनिकांची मुले/मुली/ पती/पत्नी व स्वतः माजी सैनिक यांच्यासाठी राखीव जागेवर महाराष्ट्र राज्यात सेवेत असलेल्या तसेच महाराष्ट्रातील रहिवासी असलेले परंतु राज्याबाहेर सैन्यदलात नोकरीत असलेल्या अधिकारी/सैनिक/कर्मचारी यांची मुले/मुली/पती/पत्नी यांनी इतर राज्यातील मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी परीक्षा उत्तीर्ण केली आहे, असे उमेदवार त्यांच्यासाठी २८ टक्क्यामधील २ टक्के राखीव असलेल्या जागांवर प्रवेशास पात्र राहतील.

**क)** शिक्षणशास्त्र महाविद्यालयांच्या एकूण प्रवेश-क्षमतेच्या २ टक्के जागा महाराष्ट्राबाहेरील मान्यताप्राप्त विद्यापीठातील पदवीधरांसाठी तसेच ५.२ ब (१) मधील मुक्त विद्यापीठांची महाराष्ट्रातील केंद्रे वगळून महाराष्ट्राबाहेरील केंद्रातील पदवीधरांसाठी राहतील. या जागेसाठी सर्व उमेदवार खुल्या गटातील समजण्यात येतील. त्यांना माध्यमाची व विषयाची प्रवेश नियमावलीतील अट पूर्ण करणे बंधनकारक राहील.

**ड)** ३० (२८ + २) टक्के जागांसाठी विद्यापीठांबाहेरील उमेदवारांचे पुरेसे अर्ज न आल्यास उर्वरित जागा संबधित महाविद्यालयाच्या विद्यापीठ क्षेत्रातील ७० टक्के कोट्याच्या प्रतिक्षा यादीतील उमेदवारांमधून गुणवत्तेनुसार भरण्यात येतील.

**इ)** १) उर्दू व गुजराथी माध्यमाच्या अध्यापन पध्दती असलेल्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील ७० टक्के जागा त्याच विद्यापीठ क्षेत्रातील उमेदवारांमधून भरण्यात येतील व ३० टक्के जागा राज्यातील अन्य विद्यापीठ क्षेत्रातील उमेदवारांमधून गुणवत्तेनुसार भरण्यात येतील.

२) स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड, या विद्यापीठ क्षेत्रातील उर्दू माध्यमाचे विद्यार्थी डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या विद्यापीठाच्या उर्दू माध्यमाच्या महाविद्यालयात ७० टक्के जागांवर प्रवेशासाठी पात्र राहतील. उर्वरित २८ टक्के जागा राज्यातील अन्य विद्यापीठ क्षेत्रातील व २ टक्के जागा राज्याबाहेरील विद्यापीठाच्या उमेदवारांतून भरण्यात येतील. त्यानंतर काही जागा शिल्लक राहिल्यास त्याच विद्यापीठाच्या क्षेत्रातील प्रतिक्षा यादीतील उमेदवारांमधून भरण्यात येतील.

३) महाराष्ट्रातील उर्दू व गुजराथी माध्यमासाठी / अध्यापन पध्दतीसाठी पुरेसे उमेदवार प्रवेशासाठी उपलब्ध न झाल्यास रिक्त जागांवर अन्य राज्यातील उमेदवारांचा गुणवत्तेनुसार विचार

करण्यात येईल.

**ई)** काश्मिरी विस्थापितांसाठी शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभाग क्रमांक : टीईएम ८०९६ / ( ७१८८) / टीई १, दिनांक २४ जून, १९९६ अनुसार प्रत्येक शिक्षणशास्त्र महाविद्यालयातील प्रत्येक मंजुर तुकडीकरिता अधिकची १ जागा प्रवेशासाठी दिली जाईल.

**फ)** १) इंग्रजी / उर्दू / हिन्दी / मराठी / गुजराथी माध्यमात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या उमेदवारांचे शालेय शिक्षण / उच्च माध्यमिक / पदवी / पदव्युत्तर स्तरावरील शिक्षण त्या त्या माध्यमातून होणे आवश्यक आहे अथवा उमेदवाराने पदवी स्तरावर ती भाषा अभ्यासलेली असावी. उमेदवाराने ज्या माध्यमात प्रवेश घेतला आहे त्याला त्याच माध्यमात सरावपाठ घ्यावे लागतील.

२) इंग्रजी माध्यमात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या उमेदवारांची CET सोबत ५० गुणांची इंग्रजी भाषा ज्ञान चाचणी घेतली जाईल. या चाचणीत जे उमेदवार किमान ५० टक्के गुण प्राप्त करतील तेच इंग्रजी माध्यमाच्या महाविद्यालयांमध्ये प्रवेशास पात्र राहतील. इंग्रजी भाषाज्ञान चाचणी प्रश्नपत्रिकेचा अभ्यासक्रम व भारांश पुढे दिल्यानुसार असेल :

| Sr. No. | Syllabus Content | Weightage |
|---|---|---|
| 1 | Reading Comprehension – Picture, Poetry, Prose & Dialogue | 40% |
| 2 | Vocabulary Focus - Spellings, Antonyms, Synonyms, Homonyms. | 10% |
| 3 | Grammar Focus - a) Punctuation, b) Articles, c)Prepositions, d) Conjunctions, e)Degree Of Adjectives. | 16% |
| 4 | Sentence Formation - | 14% |
| | a) Conversion of sentences from Affirmative-Negative, Interrogative – Assertive - Exclamatory | |
| | b) Jumbled sentences | |
| | c) Identifying errors in sentences | |
| 5 | Phonetics – i) Phonetic transcription, ii) Accent, iii) Intonation Pattern | 06% |
| 6 | Verbal Idioms and Proverbs | 10% |
| 7 | Figures of Speech | 04% |
| | Total | 100% |

**ग) कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय संस्कृत विद्यापीठातील प्रवेशाची अर्हता :** ज्याने महाराष्ट्र शासनाची बी.एड. प्रवेशासाठी असलेली सी.ई.टी (Common Enterance Test) परीक्षा सन २०११-१२ साठी उत्तीर्ण केली आहे व जो उमेदवार कोणत्याही विद्यापीठाच्या कला, विज्ञान, वाणिज्य इत्यादी विद्याशाखेचा पदवीधर आहे व त्याने राज्याच्या माध्यमिक व उच्च माध्यमिक बोर्डाची शालांत परीक्षा (एस.एस.सी.) संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण केली आहे किंवा याहून वरच्या वर्गाची / स्तरांची परीक्षा संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण केली आहे असा अर्हताधारक अर्जदार या विद्यापीठाच्या नागपूर (दोन महाविद्यालये), परतवाडा, रामटेक, अकोला, दारापूर (एकूण ६०० जागा) येथील ब्री.एड. महाविद्यालयात प्रवेश घेण्यास पात्र आहे. येथे इतर बी.एड. अभ्यासक्रमामध्ये उपलब्ध १६ अध्यापन पध्दती निवडीसाठी उपलब्ध आहेत. विद्यापीठाच्या परीक्षेसाठी मराठी, हिंदी, इंग्रजी, संस्कृत यापैकी कोणतेही माध्यम घेता येते. कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाद्वारे स्वतःची गुणवत्तायादी आणि प्रवेश स्वतंत्रपणे केंद्रीभूत पध्दतीने विद्यापीठाकडूनच केले जातील. या विद्यापीठाने त्यांच्या नियमाप्रमाणे पात्रता पडताळून गुणवत्तेप्रमाणे प्रवेश द्यावयाचे आहेत. यामध्ये ९८ टक्के कोटा हा महाराष्ट्रासाठी व २ टक्के कोटा महाराष्ट्राबाहेरील उमेदवारांसाठी आहे. सदर प्रवेश कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय यांनी तयार केलेल्या नियमानुसार देण्यात येतील. रिक्त राहिलेल्या जागा उपलब्धतेनुसार महाराष्ट्रातील किंवा बाहेरील अर्जदारांमधून गुणवत्तेनुसार भरण्यात येतील.

**संस्कृत विद्यापीठाची प्रवेश प्रक्रिया :** महाराष्ट्र शासनाच्या सन २०११-१२ च्या सी.ई.टी. परीक्षेचा निकाल लागल्यावर कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयातर्फे महाराष्ट्रातील सर्व प्रमुख वर्तमानपत्रांत प्रवेशासाठी जाहिरात दिली जाईल. ही जाहिरात www.sanskrituni.net या विद्यापीठाच्या

संकेत स्थळावरही प्रसिध्द केली जाईल. त्या जाहिरातीत विद्यापीठाशी संलग्नित प्रवेशयोग्य महाविद्यालयांची नांवे अर्जदाराने पसंतीक्रम दर्शविण्यासाठी नमूद केली जातील. ज्याने महाराष्ट्र / अन्य राज्याच्या माध्यमिक व उच्च माध्यमिक बोर्डाची शालांत परीक्षा (एसएससी) संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण असलेल्या किंवा याहून वरच्या वर्गाची/स्तरांची परीक्षा संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण असलेल्या आणि सी.ई.टी उत्तीर्ण असलेल्या विद्यार्थ्यांनी प्रवेशासाठी विश्वविद्यालयाने दिलेल्या नमुन्यात अर्ज करावा. अर्जाचा नमुना संकेत स्थळावर उपलब्ध असेल. त्यानंतर विश्वविद्यालयाने जाहिरात दिलेल्या प्रवेश वेळापत्रकानुसार प्रवेश केले जातील. ही संपूर्ण प्रवेश प्रक्रिया प्रत्येक टप्प्यानुसार संकेत स्थळावर उपलब्ध असेल. बी.एड. चे सर्व प्रवेश विश्वविद्यालयाच्या केंद्रीय प्रवेश समितीद्वारे केले जातील.

ए) **एस.एन.डी.टी.महिला विद्यापीठ :** या विद्यापीठाच्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयात ७० टक्के जागांसाठी एस.एन.डी.टी.ची अध्यापक महाविद्यालये ज्या विभागक्षेत्रात येतात त्या विभागक्षेत्रातील त्या महाविद्यालयातील प्रवेशासाठी एस.एन.डी.टी. विद्यापीठाच्या ज्या पात्र उमेदवारांनी त्या महाविद्यालयासाठी अर्ज केला आहे त्यांना गुणवत्तेनुसार प्रथम प्रवेश दिला जाईल व उरलेल्या जागा त्या त्या विभागातील महिला उमेदवारांतून गुणवत्तेनुसार भरण्यात येतील.

**ऐ) अपंगाचे शिक्षक म्हणून काम करता येण्यासाठी विशेष बी.एड.अभ्यासक्रम (B.Ed Special Education) :** विशेष शिक्षण म्हणजे कर्णबधिर, अंध, मतिमंद, अध्ययन अक्षमता असणारे, अस्थिव्यंग व मेंदूसंबंधित दुर्बलता असणारे इत्यादी विशेष शैक्षणिक गरजा असणाऱ्या विविध प्रकारच्या अपंग मुलांचे शिक्षण. हे शिक्षण अपंगाच्या विशेष शाळेत, सर्वसाधारण मुलांच्या शाळेत, समावेशित शिक्षणांतर्गत सर्व शाळांमध्ये प्रवेश दिलेल्या अपंगांना त्यांच्या गरजानुसार दिले जाते.

नवीन विचारधारेनुसार आता या मुलांना अपंग असे संबोधले जात नाही. ह्या सर्व मुलांना आता **विशेष गरजा असलेली मुले** असे संबोधले जाते. या मुलांचे शिक्षण, विशेष शिक्षणासाठी प्रशिक्षित शिक्षकांशिवाय होऊ शकत नाही. हे विशेष शिक्षण प्रशिक्षण ज्या महाविद्यालयात दिले जाते, त्या महाविद्यालयांना **विशेष शिक्षण अध्यापक महाविद्यालये** असे म्हणतात. या महाविद्यालयांत वेगवेगळ्या प्रकारचे अपंगत्व असलेल्या मुलांना शिकविण्यासाठी प्रशिक्षित शिक्षक तयार केले जातात. भारतीय पुनर्वास परिषद (RCI) नवी दिल्ली यांच्याद्वारे मान्यताप्राप्त अभ्यासक्रम, विद्यार्थीसंख्या या महाविद्यालयात असतात. भारतीय पुनर्वास परिषदेची मान्यता असल्याशिवाय कोणीही व्यक्ती किंवा कोणतेही अध्यापक महाविद्यालय या क्षेत्रात काम करु शकत नाही. या क्षेत्रात बी.एड. केल्याने आता अनेक ठिकाणी रोजगाराच्या संधी उपलब्ध होत आहेत.

१. राष्ट्रीय शिक्षण मोहिमे अंतर्गत प्रत्येक तालुका स्तरावर आता या विशेष शिक्षकांची नियुक्ती केली जात आहे. पुढे भविष्यात या शिक्षकांची केंद्र स्तरावरही अधिक गरज पडणार आहे.
२. हे प्रशिक्षण पूर्ण झाल्यावर सर्वसामान्य मुलांच्या शाळेत समावेशित शिक्षणात विशेष शिक्षक म्हणून काम करता येते.
३. माध्यमिक स्तरावरील समावेशित शिक्षणात ३ अपंग मुलांमागे एक विशेष शिक्षकांची नियुक्ती प्रत्येक शाळेत केली जाणार आहे.
४. विशेष शाळेत विशेष शिक्षक म्हणूनही काम करता येते. महाराष्ट्रात ६९ अंधांच्या, ३८७ कर्णबधिरांच्या, ६४९ मतिमंदांच्या, २३८ अस्थिव्यंग मुलांच्या अशा एकूण १३४३ शाळा आहेत.
५. याशिवाय बी.एड. नंतर विशेष शिक्षण पदविका स्तरावर शिक्षकाचे काम करता येते.
६. अपंगांचे विशेष ट्युशन क्लासेस घेता येतात.
याशिवाय सरकारच्या अपंग पुनर्वसन कार्यक्रमात (C.B.R.) अनेक रोजगाराच्या संधी उपलब्ध होऊ शकतात.

**( सूचना : या अभ्यासक्रमासाठी इच्छुक उमेदवारांनी अर्जात स्वतंत्र नोंद करावी.)**

६ **वेगवेगळ्या घटकांसाठी राखीव जागा (आरक्षण)**

६.१ बी.एड. अभ्यासक्रमासाठी ७० टक्के व ३० टक्के जागांवर प्रवेश देताना शासनाच्या आरक्षणासंबंधीच्या प्रचलित धोरणानुसार एकूण प्रवेश क्षमतेच्या ५० टक्के जागा महाराष्ट्रातील मागासवर्गीय घटकांसाठी राखीव असून त्यांचे संवर्गनिहाय आरक्षणाचे प्रमाण पुढील प्रमाणे राहील :

| अ.क्र | संवर्ग | टक्केवारी |
|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती व अनुसुचित जातीमधील बौध्द धर्म स्वीकारलेल्या व्यक्ती (S.C.) | १३ |

